महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाची
सदस्यांना सहकार्य करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

परिपत्रक क्रमांक-सीएपी-१००१/३९७/पोल-६अ,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२, दिनांक :- ८ नोव्हेंबर,२००१

## परिपत्रक

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या दि. २९.८.२००१ रोजी मंत्रालयात झालेल्या बैठकीत असा मुद्या उपस्थित झाला की, आयोगाचे सदस्य ज्यावेळी निरनिराळया पोलीस स्टेशनला तक्रारीच्या अनुषंगाने भेटी देतात त्यावेळी पोलीसांकडून पुरेसे सहकार्य मिळत नाही.

२. तरी उपरोक्त तक्रार विचारात घेऊन अशा सूचना देण्यात येत आहेत की,महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाचे सदस्य ज्या-ज्या वेळी निरनिराळया तक्रारीच्या अनुषंगाने पोलीस स्टेशनला भेटी देतील त्यावेळी सदस्यांना आवश्यक ते सर्वतोपरी सहकार्य करण्याबाबत सर्व पोलीस अधिका-यांना सूचना देण्यात याव्यात. पोलीस सहकार्य करत नाही अशाप्रकारे कोणतीही तक्रार प्राप्त झाल्यास संबंधित पोलीस स्टेशनचे प्रभारी अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येऊन त्यांचे विरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ना. रा. शेरे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त,मुंबई/नवी मुंबई/ठाणे/नाशिक/पुणे/सोलापूर/औरंगाबाद/अमरावती/नागपूर/रेल्वे,मुंबई.
विशेष पोलीस महानिरीक्षक, ठाणे परिक्षेत्र.
विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र
विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र
विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद परिक्षेत्र
विशेष पोलीस महानिरीक्षक, नांदेड परिक्षेत्र.
विशेष पोलीस महानिरीक्षक, अमरावती परिक्षेत्र.
विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परिक्षेत्र.